**"महाराष्ट्र अनुसूचित जमातीच्या भोगवटदारांना झाडांची विक्री करणे (विनियमन) अधिनियम, १९६९ या अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने" (२४०६ ०६८६) निधी वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२४/प्र.क्र.२०८/फ-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : २ जुलै, २०२४.

वाचा :-

१. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक १.०४.२०२४.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१३/८२/२०२४-२५, दिनांक ३०.०४.२०२४.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.-कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१३/१३७/२०२४-२५, दिनांक २०.०५.२०२४.

प्रस्तावना :

"महाराष्ट्र अनुसुचित जमातीच्या भोगवटदारांना झाडांची विक्री करणे (विनियमन) अधिनियम, १९६९ या अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने (२४०६ ०६८६)" या राज्य योजनेअंतर्गत सन २०२४-२५ करिता एकूण रु. ६००.०० लक्ष निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

**२.** सदर योजनांतर्गत आदिवासी खातेदारांना त्यांच्या खाजगी मालकीत झाडाची तोड केल्यानंतर लिलाव होईपर्यंतच्या काळापर्यंत शासनाकडून अग्रिम देण्यात येते. अधिनियमानुसार सदर प्रदाने विहित कालावधीमध्ये देणे आवश्यक आहे. यास्तव या योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीपैकी एकूण रु. १४६.९६ लक्ष निधीची गडचिरोली, नागपूर, छ. संभाजी नगर, अमरावती व चंद्रपूर या वनवृत्तासाठी आवश्यकता असल्याने सदर निधी BDS द्वारे वितरीत करण्याची अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. २ व ३ च्या पत्रान्वये शासनास विनंती केली आहे.

**३.** वित्त विभाग, शासन परिपत्रक दिनांक १.०४.२०२४ अन्वये प्रस्तुत लेखाशिर्षाअंतर्गत उपलब्ध लेखानुदानाच्या मर्यादेत ०२- मजूरी या उद्दिष्टांसाठी अर्थसंकल्पित निधीची १०० टक्के तरतूद उपलब्ध असून इतर ५०- इतर खर्च उपशिर्षांतर्गत उपलब्ध लेखानुदानापैकी मागणी केलेला निधी वितरीत करण्यास नियोजन विभागाने अनौ.संदर्भ क्र.२८८०/१४७५, दि.१२.०६.२०२४ व वित्त विभागाने अनौ.संदर्भ क्र.२३९/व्यय-१०, दि. २५.०६.२०२४ अन्वये मान्यता दर्शविली आहे.

**४.** हे पहाता, सदर लेखाशिर्षा अंतर्गत एकूण रु. २००.०० लक्ष (०२- मजूरी रु. १४.०० लक्ष व ५०- इतर रु. **१८६.००** लक्ष) उपलब्ध लेखानुदानापैकी वित्त विभागाचे उक्त परिपत्रक, नियोजन व वित्त विभागाची मान्यता व BDS प्रणालीवरील उपलब्ध लेखानुदानाच्या मर्यादेत सद्य:स्थितीत एकूण रु. १३३.१० लक्ष निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. सदर निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:**

"महाराष्ट्र अनुसूचित जमातीच्या भोगवटदारांना झाडांची विक्री करणे (विनियम) अधिनियम, १९६९ आदिवासी खातेदारांना प्रदाने" (२४०६ ०६८६) या योजनेअंतर्गत उपलब्ध लेखानुदानाच्या मर्यादेत एकूण **रु. १३३.१०** (०२- मजूरी- रु. १४.०० लक्ष व ५०- इतर खर्च- रु. ११९.१० लक्ष) निधी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांना त्यांच्या संदर्भाधीन मागणीच्या अनुषंगाने खालील तपशिलानुसार तसेच अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | वनवृत्त | वितरित रक्कम (लक्ष) | | |
|---|---|---|---|---|
| | | ०२- मजूरी | ५०- इतर खर्च | एकूण |
| १ | गडचिरोली | ३.६० | **०.०** | ३.६० |
| २ | नागपूर | **०.०** | ६१.०० | ६१.०० |
| ३ | छ. संभाजीनगर | **०.००** | २०.०० | २०.०० |
| ४ | अमरावती | ८.०० | ०.५० | ८.५० |
| ५ | नागपूर | १.७० | २८.३० | ३०.०० |
| ६ | चंद्रपूर | ०.७० | ९.३० | १०.०० |
| **एकूण** | | **१४.००** | **११९.१०** | **१३३.१०** |

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा.
२) कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.
३) वित्त विभागाने दिनांक ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.
४) सदर मान्यता ही सन २०२४-२५ या कालावधी करिताच देण्यात येत आहे.
५) वित्त विभागाने विविध शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.
६) खर्चाच्या अनुषंगाने उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.
७) आर्थिक वर्षाअखेर वितरीत निधी आर्णि अखर्चित निधी यांची पडताळणी करुन अखर्चित निधी तातडीने शासनखाती जमा करण्यात यावा.

२. सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-७, २४०६ वनीकरण व वन्य जीवन ८०० इतर खर्च, (०१) इतर खर्च, (०१) (०५) "महाराष्ट्र अनुसूचित जमातीच्या भोगवटदारांना झाडांची विक्री करणे (विनियम) अधिनियम, १९६९ अन्वये आदिवासी खातेदारांना प्रदाने" (२४०६ ०६८६) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२४-२५ मध्ये मंजूर अर्थसंकल्पित अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच इतर बाबतीत दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे. त्याच प्रमाणे खर्चाच्या अनुषंगाने उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. २८८०/१४७५, दि. १२.०६.२०२४ आणि वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.२३९/व्यय-१०, दिनांक २५.०६.२०२४ च्या मान्यतेने, शासन निर्णय क्रमांक वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये व वित्त विभागाच्या परिपत्रक दिनांक १.०४.२०२४ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०२१३००२०९२१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVIKIRAN
SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=223dbaf509e56a22dd8c9d33c199767837144d5824e7011745d9a521fdbedad3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B752370B557D0A3E58B4B069230BC54F6A13D04798D2EE7A3F1C7DCC5655271C, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2024.07.02 13:12:07 +05'30'

**( डॉ. रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वनसंरक्षक ( मंत्रालय)**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती / चंद्रपूर.
५) वनसंरक्षक, गडचिरोली/ छ. संभाजी नगर/नागपूर
६) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.